**कला संचालनालयाच्या आस्थापनेवरील हंगामी व कंत्राटी तत्वावरील अधिव्याख्यात्यांची अस्थायी पदे दि. १ ऑक्टोबर, २०१९ ते २९ फेब्रुवारी, २०२० कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन निर्णय क्रमांक :- एडीआर-२०१९/प्र.क्र ३१/तांशि ६**

मंत्रालय, विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० सप्टेंबर, २०१९.

<u>वाचा</u> :-
१. शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्रमांक :- एडीआर-२०१४/ प्र. क्र ८३/तांशि ६ , दि.२१ जुलै, २०१४.
२. शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्रमांक :- एडीआर-२७११ /प्र.क्र १४४/१७/तांशि ६ , दि.२० नोव्हेबर, २०१७.
३. शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्रमांक :- एडीआर-२७११/ प्र.क्र.१४४/१७/तांशि ६ , दि.२३ जानेवारी, २०१८.
४. शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्रमांक :- एडीआर-२७११/ प्र.क्र.१४४/१७/तांशि ६ , दि.१६ मार्च, २०१८.
५. शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्रमांक :- एडीआर-२७११/ प्र.क्र.१४४/१७/तांशि ६ , दि.८ ऑक्टोबर, २०१८
६. शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्रमांक :- एडीआर-२०१९/ प्र.क्र. ३१/तांशि ६ , दि.४ एप्रिल, २०१९.
७. शासन निर्णय,वित्त विभाग क्रमांक :-पदनि-२०१६/प्र क्र ८/१६/आ.पु.क दि.११ सप्टेंबर,२०१९.
८. प्र. कला संचालक, कला संचालनालय मुंबई यांचे पत्र क्र डिओअे-२०१९/ तीन/ १५६३, दि.१९ सप्टेंबर, २०१९.

**<u>प्रस्तावना:-</u>**

कला संचालनालयाच्या आस्थापनेवरील ११५ स्थायी मंजूर पदांपैकी रिक्त पदावर हंगामी व करार तत्वावर नियुक्त केलेल्या अधिव्याख्यात्यांचे वेतन/मानधन आहरित करण्याच्या अनुषंगाने, तत्कालिन परिस्थितीनुसार तात्पुरत्या स्वरूपात अधिव्याख्यात्यांची स्थायी पदे अस्थायी पदात रूपांतरीत करण्यास व सेवार्थ प्रणालीत अस्थायी पदांचे देयक निर्माण करण्यास संदर्भाधीन अ. क्र १ येथील दि. २१.०७.०१४च्या आदेशान्वये मंजूरी देण्यात आली . त्यानुसार सदर पदांना ३०.०९.२०१९पर्यत वेळोवेळी मुदतवाढ देण्याचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. वित्त विभागाच्या दि. ११ सप्टेंबर, २०१९च्या शासन निर्णयान्वये अस्थायी पदांना दि. १.१०.२०१९ते २९.०२.२०२० पर्यत मुदतवाढ देण्याचे अधिकार/संबंधित प्रशासकीय विभागांना

प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार शासकीय कला महाविद्यालयातील अधिव्याख्यात्यांच्या रिक्त पदांवर अस्थायी स्वरूपात कार्यरत असलेल्या कंत्राटी व हंगामी स्वरूपाच्या अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

कला संचालनालयाच्या आस्थापनेवरील अधिव्याख्यातांच्या रिक्त पदांवर कार्यरत असलेल्या २६ कंत्राटी व ११ हंगामी अधिव्याख्यातांच्या अस्थायी पदांना दि.१ ऑक्टोबर,२०१९ ते २९ फेब्रवारी, २०२० या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात येत आहे. हे आदेश वित्त विभागाच्या दि.११ सप्टेंबर, २०१९ च्या शासन निर्णयान्वये, प्रशासकीय विभांगाना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१९०९३०१६५८११०३०८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandesh
Rajaram Utekar

Digitally signed by Sandesh Rajaram Utekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=009789e9fe23fde06096381e43bebecd32b5c692c899745eee7d89d805005a87, cn=Sandesh Rajaram Utekar
Date: 2019.09.30 16:59:58 +05'30'

**( सं. रा. उतेकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.महालेखापाल,-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/लेखा परिक्षा) मुंबई /नागपूर
२.अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
३.निवासी व लेखा अधिकारी,मुंबई
४.प्र. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५.अधिष्ठाता सर ज.जी. कला महाविद्यालय, मुंबई.
६. अधिष्ठाता सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई.
७.अधिष्ठता, शासकीय कला व अभिकल्प महाविद्यालय, नागपूर/औरंगाबाद.
८. वित्त विभाग(कोषा प्र ५ )मतंत्रालय मुंबई-४०००३२.
९.सहायक संचालक, सेवार्थ लेखा व कोषागारे, महाराष्ट्र शासन, मुंबई.
१० निवडनस्ती तांशि ६.